श्री.ओंकार पुना साऊसाखरे, श्री.गणराज पुना गभणे, श्री. विजय दसराम मानकर व श्री. शालिकराम सदाशिव बागडे यांनी दाखल केलेल्या रिटपिटिशनच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांच्या न्यायनिर्णयानुसार थकबाकीची रक्कम अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०१९/प्र.क्र.१३२/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ ऑक्टोबर,२०२०

वाचा:-

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. युएलपी-१००५./२०५५२//प्र.क्र.०२/ भाग-६/आस्था-३/९४७. दि.९/८/२०१९.
२) मा. औद्योगिक न्यायालय,भंडारा, यांचा दिनांक २८/७/२००४ चा न्यायनिर्णय.
३) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, येथे दाखल रिटपिटिशन क्र.३४७४/२००५ ३८४४/२००५,३५०९/२००५ व ३८६३/२००५ मध्ये दिनांक ९/३/२०१० रोजी झालेला न्यायनिर्णय.
४) आयडीए-१५/२०१७ व १६/२०१७ मध्ये मा. कामगार न्यायालय भंडारा यांचे दि.१७/५/२०१९ चा आदेश

प्रस्तावना:-

श्री. ओकार पुना साऊसाखरे, व श्री. गणराज पुना गभणे हे तक्रारदार हे सन १९८५ पासून तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, डोंगरगाव येथे रोजंदारी तत्त्वावर काम करीत होते. एका वर्षामध्ये २४० दिवसापेक्षा जास्त काम केल्यामुळे त्यांना सेवेत कायम करुन सर्व लाभ मिळणेसाठी त्यांनी मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे युएलपी क्र.१९/१९९७ व १८/१९९७ अन्वये तक्रार दाखल केली. मा.न्यायालयाने दि.२८.७.२००४ रोजीच्या न्यायनिर्णयान्वये सर्वश्री साऊसाखरे व गभणे यांना “सेवेत नियमित करुन दि.१.४.१९९६ पासून वेतनाची थकबाकी अदा” करण्याचे आदेश दिले आहेत.

मा.औद्योगिक न्यायालय भंडारा, यांच्या आदेशाची पुर्तता न झाल्याने तक्रारदाराने मा.उच्च न्यायालय खंडपीठ, नागपूर येथे रिट पिटीशन क्र. ३८४४/०५ (गणराज गभणे), ३५०९/०५ श्री.साऊसाखरे, ३४७४/०५ (विजय मानकर), ३८६३/०५ (राष्ट्रीय मजदूर सेनामध्ये श्री. शालीकराम सदाशिव बागडे) यांनी दाखल केले होते. सदर प्रकरणांमध्ये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, यांनी दि.९.३.२०१० रोजी न्यायनिर्णय देऊन मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा यांचा दि.२८.७.२००४ रोजीचा न्यायनिर्णय कायम ठेवला.मा.उच्च न्यायालयाच्या दि.९.३.२०१० रोजीच्या न्यायनिर्णयाची

अंमलबजावणी न झाल्यामुळे श्री.गणराज गभणे यांना नियुक्ती न दिल्याने तक्रारदाराने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर येथे अवमान याचिका क्र. २९/२०१३ दाखल केली. तिचा न्यायनिर्णय दि.१४.११.२०१७ रोजी होऊन दि.९.३.२०१० रोजीच्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबतचे निर्देश देण्यात आले. मा. उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने सदर रोजंदारी मजूरांना वेतनाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

श्री. ओंकार पुना साऊसाखरे, ग्रेड-१ मजूर यांनी दि.१.४.२००४ ते दि.१३.११.२०१७ या कालावधीचे वेतन रक्कम रु.२०,४३,५३७/- मिळावी यासाठी स्थानिक कामगार न्यायालय, भंडारा येथे आयडीए क्र.१५/२०१७ व श्री. गभणे यांनी १६/२०१७ अन्वये दाखल केलेल्या प्रकरणी. मा. कामगार न्यायालय, भंडारा यांनी दि.१७.५.२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने श्री. साऊसाखरे व श्री. गभणे यांना वेतनाची थकबाकीची रक्कम प्रत्येकी रु.२०,४३,५३७/-न्यायनिर्णयापासून ३० दिवसांच्या आंत अदा करण्याचे आदेश देण्यात आले, सदर न्यायनिर्णयानुसार त्यांना रक्कम देणे आवश्यक आहे.

२. श्री. विजय मानकर व श्री.शालीकराम बागडे तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, डोंगरगांव, जि. भंडारा येथे रोजंदारी तत्वावर सन १९८६ पासून काम करीत होते.सदर रोजंदारी मजूरांनी कामावर कायम करण्यात येवून सर्व लाभ मिळण्याबाबत मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे युएलपी क्र. २०/१९९७ दाखल केले होते. मा. औद्योगिक न्यायालयाने दि.२८/७/२००४ रोजीच्या न्यायनिर्णयामध्ये श्री. मानकर व बागडे यांना सेवेत नियमित करून दि.१/४/१९९६ पासून वेतनाची थकबाकी अदा करण्याचे आदेश दिले होते.सदर न्यायनिर्णयाची अमंलबजावणी न झाल्याने त्यांनी मा. उच्च न्यायलयात रिट पिटीशन क्र. ३४७४/०५ व ३८६३/०५ दाखल केली होती.

३. सदर रिटपिटिशन मध्ये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, यांच्या दि.९.३.२०१० च्या न्यायनिर्णयानुसार जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, भंडारा कार्यालयाने दि.१६.५.२०१९ च्या आदेशान्वये श्री. विजय मानकर आणि श्री. शालीकराम बागडे या मजूरांना पूर्वलक्षी प्रभावाने नियुक्ती दिलेली आहे. श्री.विजय दत्ताराम मानकर यांच्या दि.१.४.२००४ ते दि.१५.५.२०१९ पर्यंत वेतनातील थकबाकीचा फरक रु.२६,६६,००१/-व श्री. शालीकराम सदाशिव बागडे यांच्या दि.१.५.१९९७ ते दि.१५.५.२०१९ पर्यंत वेतनाच्या थकबाकीचा फरक रु.२९,४७,०५९/- मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्या न्यायनिर्णयानुसार देय असून त्याबाबत मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, येथे अवमान याचिका क्र.२२२/२०१८ दाखल झालेली आहे. सदर थकबाकीची रक्कम खालील तक्त्यात दिल्याप्रमाणे अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(रक्कम रूपयात)

| अ.क्र. | रोजंदारी मजूराचे नाव | कालावधी | | फरकांची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. ओंकार पुना साऊसाखरे | १ एप्रिल,२००४ | १३ नोव्हेंबर,२०१७ | २०,४३,५३७/- |
| २ | श्री. गणराज पुना गभणे | १ एप्रिल,२००४ | १३ नोव्हेंबर,२०१७ | २०,४३,५३७/- |
| ३ | श्री. विजय दसराम मानकर | १ एप्रिल,२००४ | १५ मे,२०१९ | २६,६६,००१/- |
| ४ | श्री. शालिकराम सदाशिव बागडे | १ मे,१९९७ | १५ मे,२०१९ | २९,४७,०५९/- |
| | | | एकूण | ९७,००,१३४/- |

४. वरील ४ मजूरांची वेतनाच्या थकबाकीची रक्कम देण्यासाठी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला,उप विभाग-दोन अनु.क्र.२ नियम ७ नुसार भारीत आकस्मिक खर्चास मंजूरी देण्यासाठी त्या नियमामध्ये नमूद अटीच्या अधिन राहून प्रशासनीक विभाग प्रमुख यांना पुर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेला आहे. या अधिकराचा वापर करून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर मजूरांना न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी थकबाकीच्या रकमेची खातरजमा करुन शासनाचे प्रचलित नियम,अटी व शर्ती व आदेश यांचे अनुपालन करण्यात यावे. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

५. सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय अनुदानातून मागणी क्र. डी-३, २४०१ पिकसंवर्धन, १०३ बि-बियाणे (००) (०१), तालुका बिजगुणन प्रक्षेत्रे , २४०१ ०२६१ (०२-मजूरी) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून रू. ९७,००,१३४/- (अक्षरी रु. सत्याण्णव लाख एकशे चौतीस फक्त) खर्च करण्यास व सदर रक्कम कोषागारातून आहरित व संवितरीत करण्यासाठी उपविभागीय कृषि अधिकारी, भंडारा, जि. नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१०३/२०२०/व्यय -१, दि.२९/६/२०२० रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२२१५०८००२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.10.22 15:09:13 +05'30'

**(अशोक आत्राम)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१) आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) संचालक (नि.व.गु.नि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर
५) विभागीय कृषि सह संचालक , नागपूर.
६) उपविभागीय कृषि अधिकारी, भंडारा,
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,भंडारा
८) जिल्हा कोषगार अधिकारी, भंडारा,
९) वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१०) अर्थसंकल्प शाखा २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.
११) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.